लोक सहभागावर आधारीत पर्यावरण कृति कार्यक्रम.-
पश्चिम घाट विकास कार्यक्रम.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३
मंत्रालय, मुबई- ४०००३२
दिनांक : ०९ मार्च, २०११

वाचा : समक्रमांकाचा शासन निर्णय दि. २६ ऑक्टोबर, २०१०.

**प्रस्तावना :**

देशातील डोंगराळ प्रदेशाच्या विकासास चालना देण्यासाठी राष्ट्रीय विकास मंडळाच्या शिफारशीनुसार १९७४-७५ या वर्षापासून महाराष्ट्र, कर्नाटक, तामिळनाडू, केरळ व गोवा या राज्यामध्ये पश्चिम घाट विकासाचा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम सुरु करण्यात आला आहे. ज्या तालुक्यातील किमान २० टक्के क्षेत्र ६०० मीटर उंचीवर किंवा त्यापेक्षा जास्त उंचीवर आहे अशा क्षेत्राचा पश्चिम घाट क्षेत्रात समावेश करण्यात आलेला आहे. त्यानुसार राज्याच्या १२ जिल्हयातील ६३ तालुक्यांमध्ये पश्चिम घाट विकास कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

या कार्यक्रमांतर्गत पश्चिम घाट क्षेत्रामध्ये लोक सहभागावर आधारीत पर्यावरण प्रकल्पांची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दिनांक ५ जून, २०१० रोजी घेण्यात आलेल्या नाविन्यपूर्ण पर्यावरण विषयक कार्यक्रमाच्या अनुषंगाने प्राप्त झालेल्या प्रस्तावांपैकी निवडक प्रस्ताव पश्चिम घाट विकास कार्यक्रमांतर्गत राबविण्याचे नियोजन विभागाने प्रस्तावित केल्यानुसार दिनांक ४ जानेवारी, २०११ रोजी सुकाणू समितीची बैठक घेण्यात आली. या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार पश्चिम घाट विकास कार्यक्रमांतर्गत पश्चिम घाट कार्यक्षेत्रात येणाऱ्या सर्व संबंधित जिल्हयांमध्ये लोकसहभागावर आधारीत पर्यावरण कृती कार्यक्रम राबविण्यास व त्यानुसार खालील तक्त्यातील व्यक्ती/संस्थे यांना मंजूर करावयाचा निधीस या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | व्यक्ती/संस्थेचे नांव | योजनेचे संक्षिप्त तपशिल | मंजूर निधी |
|---|---|---|---|
| **१) जनजागृती विषयक प्रस्ताव:** | | | |
| १ | मॅजेशियन इंद्रदत्त | मनोरंजनात्मक जादूच्या कार्यक्रमाद्वारे शालेय विद्यार्थी व लोकांमध्ये जनजागृती | रु. १७.०३ लाख |
| २. | माता अनुसया प्रॉडक्शन | पर्यावरण विषयक नाटिका सादर करुन जनजागृती | रु. १२.०० लाख |
| **२) अंमलबजावणी प्रस्ताव :** | | | |
| १ | सहयाद्री निसर्गमित्र | सागरी कासवांचे संवर्धन व त्याबाबत लोकसहभागातून जनजागृती | रु. ८.९८ लाख |
| २ | ॲग्रीकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट | जैवविविधताविषयी जनजागृती | रु. १२.०० लाख |

२. सदर मंजूर निधी पैकी वितरण करावयाची एकूण रक्कम रू.२३,७६,१५०/-, अटी व शर्ती, संस्था व व्यक्तीनिहाय विस्तृतपणे सोबतचे सहपत्रात नमूद करण्यात आलेल्या आहेत.

३. यासाठी **अवर सचिव, पर्यावरण विभाग, (Under Secretary, Environment Department) यांचे नावे रुपये २३,७६,१५०/- (अक्षरी रूपये तेवीस लाख शहात्तर हजार एकशे पन्नास फक्त ) एवढया निधीचा धनादेश काढण्यात यावा.**

४. अदा करावयाचा एकूण रू.२३,७६,१५०/- एवढा रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून संबंधितांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.दे.के.मानकर, अवरसचिव, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री.श्या.ना.धकाते, उपसचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी संबंधीत व्यक्ती/संस्थे यांना एकूण रू.२३,७६,१५०/- (रूपये तेवीस लक्ष शहात्तर हजार एकशे पन्नास फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. यावरील होणारा खर्च "मागणी क्रमांक ओ-५, २५५१-डोंगराळ क्षेत्रे-०१-पश्चिम घाट, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ००२ डोंगराळ क्षेत्रांचा विकास (००) (१७) पश्चिम घाटाचा विकास (केंद्र हिस्सा) (२५५१०२५२) " या मुख्य लेखाशिर्षाखालील संबंधित उपशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचे सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. ४४३७/ नि.वि, दिनांक ०७ मार्च, २०११ व त्या विभागाने उपरोक्त लेखाशिर्षाखाली निधी मुक्त करण्यास एकात्रितपणे घेतलेला वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९६१/१०/अर्थसंकल्प-१६, दि.७ ऑगस्ट, २०१० अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

७. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र.२०११०३०९१५४९१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

**(श्या. ना. धकाते)**
**उप सचिव (पर्यावरण), महाराष्ट्र शासन**

प्रत
मा. मुख्य सचिव
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त (पश्चिम घाट क्षेत्र)
सर्व जिल्हाधिकारी (पश्चिम घाट क्षेत्र)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महा.१, महा-२, मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सह सचिव (नियोजन विभाग/कार्या-१४८३), समिती सदस्य
उप सचिव (वित्त विभाग/व्यय-१६) समिती सदस्य
वित्त विभाग (अर्थ-०७/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई,
सर्व कार्यासने, पर्यावरण विभाग,
निवड नस्ती/तां.क.३

**पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक : ०९ मार्च, २०११**
**सोबतचे सहपत्र**

.....

पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक जानेवारी, २०११ नुसार निवड प्राप्त **"मॅजेशियन इंद्रदत्त"** यांच्या प्रस्तावावरील सुकाणू समितीच्या निर्णयानुसार राबविण्याच्या कार्यक्रमाबाबतच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे -

अ) शाळा/महाविद्यालये येथे जादूच्या प्रयोगातून पर्यावरण विषयक जनजागृती करणे,

ब) सदर कार्यक्रमाच्या वेळी जनजागृती होण्याच्या दृष्टिकोनातून पर्यावरण विषयक घोषवाक्ये, माहिती पत्रके यांचे प्रदर्शन भरविणे वा जादूच्या प्रयोगाच्या कार्यक्रमाच्या वेळी ते दर्शनी भागावर लावणे,

क) संबंधित शाळा/महाविद्यालयात, शिक्षक/मुख्याध्यापक/विद्यार्थी यांच्या सहभागातून वृक्षारोपण करणे,

ड) प्रति कार्यक्रम खर्चाची मर्यादा ही कमाल रु. १८०००/- केली असून, त्याचा तपशिल खालीलप्रमाणे -

| | **कमाल मर्यादा** |
|---|---|
| १) जादूच्या प्रयोगाचे साहित्य, सामानाची ने-आण, संबंधित कर्मचारी, मेंटेनन्स, कार्यक्रमाचे चित्रीकरण इ. | रु. १०,००० |
| २) पर्यावरण विषयक मोठी चित्रे, प्रदर्शने व अत्यावश्यक बाबीं | रु. २,००० |
| ३) प्रवास खर्च, प्रदर्शन व प्रयोगातील सहाय, भोजन-चहापान इ. | रु. ३,००० |
| ४) वृक्षारोपण, आकस्मिक खर्च इ. | रु. ३,००० |

इ) वरील नमूद बाबीं व्यतिरिक्त अन्य बाबींवरील खर्च **मॅजेशियन इंद्रदत्त** यांनी प्रकल्प अंमलबजावणीतील त्यांचा हिस्सा म्हणून खर्च करावयाचा आहे व तसा स्वतंत्र तपशिल विभागास सादर करावयाचा आहे.

इ) वरीलप्रमाणे आयोजित सदर कार्यक्रमासाठी कमाल मर्यादा रु. १८,०००/- याप्रमाणे असून त्या अनुषंगाने आपण कार्यक्रम करणे अपेक्षित असून, एकूण मंजूर रु. १७.७३ लक्ष निधी पैकी **प्रथम टप्प्यात एकूण रु.५.०० लक्ष आपणांस वितरीत करण्यात येत आहे.** याबाबत निधी उपयोगिता प्रमाणपत्र सादर झाल्यानंतर पुढील निधी वितरीत करण्यात येईल.

ई) याबाबत आपण बँक गॅरन्टी म्हणून रु.५०,०००/- सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२ या पत्त्यावर जमा करणे बंधनकारक आहे.

फ) सदर कार्यक्रम पश्चिम घाट क्षेत्रातील संबंधित तालुक्यात घेणे आवश्यक असून जिल्हानिहाय तालुक्यांची यादी **"विवरणपत्र-अ"** मध्ये नमूद आहे.

ग) प्रत्येक कार्यक्रमाच्या वेळी आपण "पर्यावरण विभाग, महाराष्ट्र शासन पुरस्कृत योजना" असे दर्शनी भागावर ठळक अक्षरात फलक लावणे अथवा प्रदर्शित करणे बंधनकारक आहे.

घ) या कार्यक्रमाच्या अनुषंगाने प्रत्येक कार्यक्रमाचा फोटो व व्हिडिओ चित्रण काढणे बंधनकारक असून, त्यावर दिनांक व वेळ प्रदर्शित होईल यांची दक्षता घ्यावी.

च) संबंधित शाळा व महाविद्यालय प्रमुखाकडून आपण आपला कार्यक्रम यशस्वीपणे पार पडला असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करावे व ते विभागास सादर करावे. याबाबत आपण संबंधित जिल्हा, तालुक्यातील शिक्षण अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालयातील प्रतिनिधी वा महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळातील संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना कार्यक्रमास उपस्थित रहाण्यास पूर्वसूचित करावे.

छ) मान्य केलेल्या उपरोक्त खर्चाच्या बाबींसाठी अन्य कोणत्याही स्त्रोतांमार्फत निधी प्राप्त होत असल्यास सदर बाब पर्यावरण विभागाच्या निदर्शनास आणून विभागाची पूर्व परवानगीने सदर खर्च करणे बंधनकारक आहे. सदर जनजागृती/अंमलबजावणी प्रकल्प हा एक मोठया प्रकल्पाची बाब असल्याने व त्यातील अन्य बाबींसाठी वेगळया आर्थिक स्त्रोतामार्फत निधी उपलब्ध झाला असल्यास/होत असल्यास त्याबाबत पर्यावरण विभागास पूर्व सूचित करणे बंधनकारक आहे.

ज) सदर योजनेच्या अंमलबजावणी पर्यावरण विभागास काही त्रुटी आढळल्यास त्यानुरुप आवश्यक ती कारवाई, न्यायालयीन कारवाई करण्यास पर्यावरण विभाग मुक्त असेल याची नोंद घ्यावी. याबाबत आपण सादर केलेली बँक गॅरेंटी पर्यावरण विभाग एन्कॅश करेल. तसेच कोणत्याही पूर्व सूचना न घेता आपल्यास मंजूर केलेली योजना रद्द करण्याचा पूर्ण अधिकार पर्यावरण विभागाकडे असेल.

झ) योजनांच्या अंमलबजावणीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आपण विहित प्रारुपानुसार सादर करणे आवश्यक असेल. ( **"विवरणपत्र-ब"** )

द) वरील नमूद बाबींसंदर्भात रु.१००/- कोर्ट फी स्टॅम्प पेपरवर अटी व शर्ती मंजूर असलेले हमीपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

**(श्या. ना. धकाते)**
**उप सचिव (पर्यावरण), महाराष्ट्र शासन**

**पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक : ०९ मार्च, २०११**
**सोबतचे सहपत्र**

.....

पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक जानेवारी, २०११ नुसार निवड प्राप्त **"माता अनुसया प्रॉडक्शन"** यांच्या प्रस्तावाबाबत संबंधित अटी व शर्ती खालीलप्रमाणे -

अ) नाटकांच्या माध्यमातून पर्यावरण विषयक जनजागृती करणे,

ब) सदर कार्यक्रमाच्या वेळी जनजागृती होण्याच्या दृष्टिकोनातून पर्यावरण विषयक घोषवाक्ये, माहिती पत्रके यांचे प्रदर्शन भरविणे वा नाटकांच्या प्रयोगाच्या कार्यक्रमाच्या वेळी ते दर्शनी भागावर लावणे,

(क) प्रति कार्यक्रम खर्चाची मर्यादा ही कमाल रु. २३,०००/- केली असून, त्याचा तपशिल खालीलप्रमाणे -

| | | <u>कमाल मर्यादा</u> |
|---|---|---|
| १) | नाटकांचे नेपथ्य, रंगभूषा, वेषभूषा इ. | रु. ४,००० |
| २) | नाटकांची जागा, प्रकाशयोजना, ध्वनी योजना, कलाकारांचे मानधन | रु. ११,००० |
| ३) | प्रवास खर्च, भोजन-चहापान, आकस्मिक खर्च इ. | रु. ८,००० |

(ड) वरील नमूद बाबीं व्यतिरिक्त अन्य बाबींवरील खर्च **"माता अनुसया प्रॉडक्शन"** यांनी प्रकल्प अंमलबजावणीतील त्यांचा हिस्सा म्हणून खर्च करावयाचा आहे व तसा स्वतंत्र तपशिल विभागास सादर करावयाचा आहे.

(इ) वरीलप्रमाणे आयोजित सदर कार्यक्रमासाठी कमाल मर्यादा रु. २३,०००/- याप्रमाणे असून त्या अनुषंगाने आपण कार्यक्रम करणे अपेक्षित आहे. **एकूण मंजूर रु. १२.०० लक्ष निधी पैकी प्रथम टप्प्यात एकूण रु.५.०० लक्ष आपणांस वितरीत करण्यात येत आहे.** याबाबत निधी उपयोगिता प्रमाणपत्र सादर झाल्यानंतर पुढील निधी वितरीत करण्यात येईल.

(ई) सदर कार्यक्रम पश्चिम घाट क्षेत्रातील संबंधित तालुक्यात घेणे आवश्यक असून जिल्हानिहाय तालुक्यांची यादी **"विवरणपत्र-अ"** मध्ये नमूद आहे.

(फ) प्रत्येक प्रयोगाच्या वेळी आपण "पर्यावरण विभाग, महाराष्ट्र शासन पुरस्कृत योजना" असे दर्शनी भागावर ठळक अक्षरात फलक लावणे अथवा प्रदर्शित करणे बंधनकारक आहे.

(ग) याबाबत आपण बँक गॅरन्टी म्हणून रु.५०,०००/- सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२ या पत्त्यावर जमा करणे बंधनकारक आहे.

(घ) या प्रयोगाच्या अनुषंगाने प्रत्येक प्रयोगाचा फोटो व व्हिडिओ चित्रण काढणे बंधनकारक असून, त्यावर दिनांक व वेळ प्रदर्शित होईल यांची दक्षता घ्यावी.

(च) आपण संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयातील प्रतिनिधी वा महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळातील संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना कार्यक्रमास उपस्थित रहाण्यास पूर्वसूचित करावे.

(छ) मान्य केलेल्या उपरोक्त खर्चाच्या बाबींसाठी अन्य कोणत्याही स्त्रोतांमार्फत निधी प्राप्त होत असल्यास सदर बाब पर्यावरण विभागाच्या निदर्शनास आणून विभागाची पूर्व परवानगीने सदर खर्च करणे बंधनकारक आहे. सदर जनजागृती/अंमलबजावणी

प्रकल्प हा एक मोठया प्रकल्पाची बाब असल्याने व त्यातील अन्य बाबींसाठी वेगळया आर्थिक स्त्रोतामार्फत निधी उपलब्ध झाला असल्यास/होत असल्यास त्याबाबत पर्यावरण विभागास पूर्व सूचित करणे बंधनकारक आहे.

(ज) सदर योजनेच्या अंमलबजावणी पर्यावरण विभागास काही त्रुटी आढळल्यास त्यानुरुप आवश्यक ती कारवाई, न्यायालयीन कारवाई करण्यास पर्यावरण विभाग मुक्त असेल याची नोंद घ्यावी. याबाबत आपण सादर केलेली बँक गॅरेंटी पर्यावरण विभाग एन्कॅश करेल. तसेच कोणत्याही पूर्व सूचना न घेता आपल्यास मंजूर केलेली योजना रद्द करण्याचा पूर्ण अधिकार पर्यावरण विभागाकडे असेल.

(झ) योजनांच्या अंमलबजावणीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आपण विहित प्रारुपानुसार सादर करणे आवश्यक असेल. ( **"विवरणपत्र-ब"** )

(द) वरील नमूद बाबींसंदर्भात रु.१००/- कोर्ट फी स्टॅम्प पेपरवर अटी व शर्ती मंजूर असलेले हमीपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

**(श्या. ना. धकाते)**
**उप सचिव (पर्यावरण), महाराष्ट्र शासन**

**पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक : ०९ मार्च, २०११ सोबतचे सहपत्र**

.....

पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक जानेवारी, २०११ नुसार निवड प्राप्त **"सहयाद्री निसर्ग मित्र"** यांच्या प्रस्तावाबाबत संबंधित अटी व शर्ती खालीलप्रमाणे -

अ) सदर योजनेंतर्गत खर्चाच्या मान्य बाबी पुढीलप्रमाणे

| | |
|---|---|
| (१) सागरी कासवांसाठी हॅचरीची निर्मिती करणे व त्याचे संरक्षण व देखरेख | रु. ३,७०,००० |
| (२) सागरी कासवांच्या संवर्धनाबाबत प्रशिक्षण जनजागृती करणे. | रु. ३,३५,००० |
| (३) सागरी कासव फेस्टिव्हल्स चे आयोजन व तद्नुषंगीक बाबी. | रु. १,९२,६५० |
| एकूण | रु. ८,९७,६५० |

ब) कार्यक्रम खर्चाची मर्यादा ही प्रस्तावित केल्याप्रमाणे कमाल रु. ८,९७,६५०/- आहे.

क) **वरीलप्रमाणे आयोजित सदर कार्यक्रमासाठी कमाल मर्यादा रु. ८,९७,६५०/- याप्रमाणे असून त्या अनुषंगाने आपण कार्यक्रम करणे अपेक्षित आहे. त्यासाठी आपणांस रु. ८,९७,६५०/- एवढी रक्कम वितरीत करण्यात येत आहे. आपणांस मंजूर व वितरीत करण्यात येणाऱ्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.**

ड) प्रकल्पाच्या ठिकाणी आपण "पर्यावरण विभाग, महाराष्ट्र शासन पुरस्कृत योजना" असे दर्शनी भागावर ठळक अक्षरात फलक लावणे अथवा प्रदर्शित करणे बंधनकारक आहे.

इ) या कार्यक्रमाच्या अनुषंगाने प्रत्येक टप्प्यात फोटो व व्हिडिओ चित्रण काढणे बंधनकारक असून, त्यावर दिनांक व वेळ प्रदर्शित होईल यांची दक्षता घ्यावी.

ई) वरील नमूद बाबीं व्यतिरिक्त अन्य बाबींवरील खर्च **"सहयाद्री निसर्ग मित्र"** यांनी प्रकल्प अंमलबजावणीतील त्यांचा हिस्सा म्हणून खर्च करावयाचा आहे व तसा स्वतंत्र तपशिल विभागास सादर करावयाचा आहे.

फ) आपण संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयातील प्रतिनिधी वा महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळातील संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना प्रकल्पाच्या ठिकाणी भेट देण्यासंदर्भात विनंती करुन त्यांचे अभिप्राय घेवून विभागास सादर करणे.

ग) सदर कार्यक्रम पश्चिम घाट क्षेत्रातील संबंधित तालुक्याती सागरी किनारा पट्ट्यात घेणे बंधनकारक आहे. जिल्हानिहाय तालुक्यांची यादी **"विवरणपत्र-अ"** मध्ये नमूद आहे.

घ) मान्य केलेल्या उपरोक्त खर्चाच्या बाबींसाठी अन्य कोणत्याही स्त्रोतांमार्फत निधी प्राप्त होत असल्यास सदर बाब पर्यावरण विभागाच्या निदर्शनास आणून विभागाची पूर्व परवानगीने

सदर खर्च करणे बंधनकारक आहे. सदर जनजागृती/अंमलबजावणी प्रकल्प हा एक मोठया प्रकल्पाची बाब असल्याने व त्यातील अन्य बाबींसाठी वेगळया अर्थिक स्त्रोतामार्फत निधी उपलब्ध झाला असल्यास/होत असल्यास त्याबाबत पर्यावरण विभागास पूर्व सूचित करणे बंधनकारक आहे.

च) सदर योजनेच्या अंमलबजावणी पर्यावरण विभागास काही त्रुटी आढळल्यास त्यानुरुप आवश्यक ती कारवाई, न्यायालयीन कारवाई करण्यास पर्यावरण विभाग मुक्त असेल याची नोंद घ्यावी. तसेच कोणत्याही पूर्व सूचना न घेता आपल्यास मंजूर केलेली योजना रद्द करण्याचा पूर्ण अधिकार पर्यावरण विभागाकडे असेल.

छ) योजनांच्या अंमलबजावणीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आपण विहित प्रारुपानुसार सादर करणे आवश्यक असेल. ( **"विवरणपत्र-ब"** )

य) वरील नमूद बाबींसंदर्भात रु.१००/- कोर्ट फी स्टॅम्प पेपरवर अटी व शर्ती मंजूर असलेले हमीपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

**(श्या. ना. धकाते)**
**उप सचिव (पर्यावरण), महाराष्ट्र शासन**

**पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक : ०९ मार्च, २०११ सोबतचे सहपत्र**

.....

पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/प्र.क्र.९८/तां.क.३, दिनांक जानेवारी, २०११ नुसार निवड प्राप्त **"ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट"** यांच्या प्रस्तावाबाबत संबंधित अटी व शर्ती खालीलप्रमाणे -

अ) या योजनेंतर्गत खालील कार्यक्रम आपणास राबविणे आवश्यक आहे-

१) पक्षी संवर्धन यात्रा/मेळावे,

२) जैवविविधत संबंधित स्थानिकांमध्ये जनजागृती करणे.

३) शाळेतील विद्यार्थ्यांच्या निसर्ग सहली आयोजित करून स्थानिक जैव विविधतेची माहिती त्यांना देणे.

४) ग्रामीण स्थानिक जनतेसाठी सर्व विषयक माहिती देणारे मेळावे आयोजित करणे.

५) वर्मीकंपोस्टिंग व अन्य माध्यमाद्वारे घनकच-यांची विल्हेवाटीबाबत प्रकल्प राबविणे.

६) पाण्याच्या संवर्धनाबाबत उपाययोजना करणारे प्रकल्प राबविणे.

ब) उपरोक्त नमूद कार्यक्रमांसाठी निवडलेल्या क्षेत्राबाबत व राबविण्याच्या योजनांबाबत विस्तृतपणे बाबनिहाय खर्चाची आकडेवारी सादर करण्यात यावी.

क) सदर कार्यक्रमाच्या वेळी जनजागृती होण्याच्या दृष्टिकोनातून पर्यावरण विषयक घोषवाक्ये, माहिती पत्रके यांचे प्रदर्शन भरविणे व कार्यक्रमाच्या वेळी ते दर्शनी भागावर लावणे,

ड) संबंधित शाळा/महाविद्यालयात, शिक्षक/मुख्याद्यापक/विद्यार्थी यांच्या सहभागातून जैवविविधता संरक्षण व संवर्धन बाबत जनजागृती प्रकल्प राबविणे.

इ) वरीलप्रमाणे आयोजित सदर कार्यक्रमासाठी कमाल मर्यादा रु. ४,७८,५००/- याप्रमाणे असून त्या अनुषंगाने आपण कार्यक्रमण करणे अपेक्षित असून, एकूण मंजूर रु. १२.०० लक्ष निधी पैकी **प्रथम टप्प्यात एकूण रु. ४,७८,५००/- आपणांस वितरीत करण्यात येत आहे.** याबाबत निधी उपयोगिता प्रमाणपत्र सादर झाल्यानंतर पुढील निधी वितरीत करण्यात येईल.

ई) वरील नमूद बाबीं व्यतिरिक्त अन्य बाबींवरील खर्च **"ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट ट्रस्ट"** यांनी प्रकल्प अंमलबजावणीतील त्यांचा हिस्सा म्हणून खर्च करावयाचा आहे व तसा स्वतंत्र तपशिल विभागास सादर करावयाचा आहे.

फ) प्रत्येक कार्यक्रमाच्या वेळी आपण "पर्यावरण विभाग, महाराष्ट्र शासन पुरस्कृत योजना" असे दर्शनी भागावर ठळक अक्षरात फलक लावणे अथवा प्रदर्शित करणे बंधनकारक आहे.

ग) या कार्यक्रमाच्या अनुषंगाने प्रत्येक कार्यक्रमाचा फोटो व व्हिडिओ चित्रण काढणे बंधनकारक असून, त्यावर दिनांक व वेळ प्रदर्शित होईल यांची दक्षता घ्यावी.

घ) आपण संबंधित जिल्हा, तालुक्यातील शिक्षण अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालयातील प्रतिनिधी वा महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळातील संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना कार्यक्रमास उपस्थित रहाण्यास पूर्वसूचित करावे. कार्यक्रम संपल्यांनतर कार्यक्रमाबाबत संबंधितांचे अभिप्राय घेवून विभागास सादर करणे.

च) सदर कार्यक्रम पश्चिम घाट क्षेत्रातील संबंधित तालुक्यात घेणे आवश्यक असून जिल्हानिहाय तालुक्यांची यादी **"विवरणपत्र-अ"** मध्ये नमूद आहे.

छ) मान्य केलेल्या उपरोक्त खर्चाच्या बाबींसाठी अन्य कोणत्याही स्त्रोतांमार्फत निधी प्राप्त होत असल्यास सदर बाब पर्यावरण विभागाच्या निदर्शनास आणून विभागाची पूर्व परवानगीने सदर खर्च करणे बंधनकारक आहे. सदर जनजागृती/अंमलबजावणी प्रकल्प हा एक मोठया प्रकल्पाची बाब असल्याने व त्यातील अन्य बाबींसाठी वेगळया आर्थिक स्त्रोतामार्फत निधी उपलब्ध झाला असल्यास/होत असल्यास त्याबाबत पर्यावरण विभागास पूर्व सूचित करणे बंधनकारक आहे.

य) सदर योजनेच्या अंमलबजावणी पर्यावरण विभागास काही त्रुटी आढळल्यास त्यानुरुप आवश्यक ती कारवाई, न्यायालयीन कारवाई करण्यास पर्यावरण विभाग मुक्त असेल याची नोंद घ्यावी. तसेच कोणत्याही पूर्व सूचना न घेता आपल्यास मंजूर केलेली योजना रद्द करण्याचा पूर्ण अधिकार पर्यावरण विभागाकडे असेल.

र) योजनांच्या अंमलबजावणीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आपण विहित प्रारुपानुसार सादर करणे आवश्यक असेल. ( **"विवरणपत्र-ब"** )

ल) वरील नमूद बाबींसंदर्भात रु.१००/- कोर्ट फी स्टॅम्प पेपरवर अटी व शर्ती मंजूर असलेले हमीपत्र सादर करणे बंधनकारक आहे.

**(श्या. ना. धकाते)**
**उप सचिव (पर्यावरण), महाराष्ट्र शासन**

**"विवरणपत्र-अ"**

**पश्चिम घाट प्रदेशांतर्गत समाविष्ट असणारे जिल्हे / तालुक्यांची यादी**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १. | **ठाणे** | मोखाडा, वाडा, शहापूर, मुरबाड, जव्हार (एकूण ५) |
| २. | **रायगड** | कर्जत, खालापूर, सुधागड-पाली, रोहा, माणगांव, महाड, पोलादपुर (एकूण ७) |
| ३. | **रत्नागिरी** | खेड, चिपळुण, संगमेश्वर, लांजा, राजापूर (एकूण ५) |
| ४. | **सिंधुदूर्ग** | कणकवली, सावंतवाडी, देवगड, कुडाळ, वैभववाडी (एकूण ५) |
| ५. | **नाशिक** | इगतपुरी, नाशिक, दिंडोरी, पेठ, कळवण, सुरगणा, सटाणा, सिन्नर, त्र्यंबकेश्वर (एकूण ९) |
| ६. | **धुळे** | साक्री (एकूण १) |
| ७. | **नंदुरबार** | नवापूर (एकूण १) |
| ८. | **अहमदनगर** | अकोला, संगमनेर (एकूण २) |
| ९. | **पुणे** | जुन्नर, आंबेगांव, खेड, मावळ, हवेली, मुळशी, वेल्हे, भोर, पुरंदर (एकूण ९) |
| १०. | **सातारा** | सातारा, वाई, पाटण, जावळी, महाबळेश्वर, खटाव, खंडाळा, कोरेगांव (एकूण ८) |
| ११. | **सांगली** | शिराळा (एकूण १) |
| १२. | **कोल्हापूर** | शाहुवाडी, पन्हाळा, करवीर, गगनबावडा, राधानगरी, कागल भुदरगड, आजरा, गडहिंग्लज, चंदगड (एकूण १०) |
| एकूण | १२ | ६३ |

## "विवरण पत्र-ब"

## Form of Utilization Certificate

| Sr.No. | Letter/Order No. Date | Amount |
|---|---|---|
| | | |
| | | |
| | **Total** | |

Certified that out of **Rs.** /- **(Rs.** **only )** of Grant-in-aid sanctioned during the year in favour of under Government letter/Order No. given in the margin and **Rs.** /- **(Rupees** **only)** has been utilized for the purpose of for which it was sanctioned and that balance of **Rs** unutilized at the end of the year has been surrendered to Government (vide No. . /- remaining Dated ) / will be adjusted towards the grants –in-aid payable during the next year. Out of total incurred expenditure **Rs.** /- contributed by project implementer.

2. Certified that I have satisfied myself that the conditions on which the grants-in-aid was sanctioned have been duly fulfilled /are being fulfilled and that I have exercised the following checks to see that the money was actually utilized for the purpose for which it was sanctioned.

**Kinds of Checks Exercised**

1. **Physical Progress verification**
2. **Separate Account Maintained for the Projects.**
3.
4.
5.

**Project Implementer**
**(Name & Signature)**

**Chartered Accountant**
**(Signature & Seal)**